**श्रीमद्भगवद्गीता 1ला अध्याय**

भारतीय तत्त्वज्ञानाचे सार सांगणारा पवित्र ग्रंथ म्हणजे 'श्रीमद्भगवद्गीता'

महर्षी व्यासांनी महाभारतातील भीष्मपर्व ह्या पाठात 'श्रीमद्भगवद्गीता' लिहीली. कौरव पांडवांच्या युद्धाच्या पार्श्वभूमीवर कुरूक्षेत्र येथे श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला गीता सांगितली असे जरी म्हटले जात असले तरी राजा धृतराष्ट्र आणि त्यांना युद्धभूमीवरील युद्धाचे वर्णन आपल्या दिव्य दृष्टीमुळे सांगू शकणारा संजय ह्यांनी सुद्धा गीता ऐकली. जवळपास 5168 वर्षां पूर्वी (3145 ई.पू.) लिहीला गेलेल्या ह्या ग्रंथात 18 अध्याय आणि 700 श्लोक आहेत. श्रीमद्भगवद्गीतेचा गणना प्रस्थानत्रयी मध्ये केली जाते ज्या मध्ये उपनिषद् आणि ब्रह्मसूत्र यांचा देखील समावेश आहे. संस्कृत भाषेत लिहिलेला हा ग्रंथ साहित्याच्या दृष्टीने सुद्धा उच्च कोटीचा आहे. ब्रह्मपुराणाच्या अनुसार मार्गशीर्ष शुक्ल एकादशी म्हणजेच “मोक्षदा एकादशी” ह्या दिवशी श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला गीता सांगितली. आपण हा दिवस गीता जयंती म्हणून साजरा करतो.

श्रीमद्भगवद्गीतेवरील अनेक टिका उपलब्ध आहेत जसे

(अ) अद्वैतवाद - शांकराभाष्य, श्रीधरकृत सुबोधिनी, मधुसूदन सरस्वतीकृत गूढ़ार्थदीपिका।

(आ) विशिष्टाद्वैत -

(१) यामुनाचार्य कृत गीता अर्थसंग्रह, वेदांतदेशिककृत गीतार्थ-संग्रह

(२) रामानुजाचार्यकृत गीताभाष्य, वेदांतदेशिककृत तात्पर्यचंद्रिका टीका.

(इ) द्वैत - मध्वाचार्य कृत गीताभाष्य, जयतीर्थकृत प्रमेयदीपिका टीका. मध्वाचार्यकृत गीता-तात्पर्य निर्णय.

(ई) शुद्धाद्वैत - वल्लभाचार्य कृत तत्वदीपिका, पुरुषोत्तमकृत अमृततरंगिणी टीका.

मराठी मध्ये संत ज्ञानेश्वरांनी लिहीलेली भावार्थदीपिका (१२९०) आपल्या सर्वांच्याच जिव्हाळ्याची. लोकमान्यांनी लिहिलेल्या गीतारहस्य ह्या ग्रंथाचा आपल्या सर्वांनाच रास्त अभिमान आहे.

श्रीमद्भगवद्गीतेच्या पहिल्या अध्यायाचे नाव

'अर्जुनविषादयोग' असे असून त्यामध्ये एकूण 47 श्लोक आहेत.

**धृतराष्ट्र उवाच**

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः। मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत सञ्जय।।1.1।।**

धृतराष्ट्र उवा च - हे संजय ! धर्म-क्षेत्रे , कुरु-क्षेत्रे , समवेताः युयुत्सवः मामकाः पाण्डवः च एव किम् अकुर्वत?

धृतराष्ट्र उवाच धृतराष्ट्र म्हणाले

हे संजय !

धर्म-क्षेत्रे , धर्मक्षेत्रावर धर्मन् क्षेत्र नपु. स. ए. व.

कुरु-क्षेत्रे कुरुक्षेत्रावर कुरुक्षेत्र नपु. स. ए. व.

समवेताः एकत्रित आलेल्या समवेत पु. प्र. ब. व.

सम् + अव + इण+क्त प्रत्यय

युयुत्सवः युद्धाची इच्छा असणाऱ्या

युयुत्सु पु. प्र. ब. व.

युध् धातू सन प्रत्यय

मामकाः माझ्या पुत्रांनी मामक पु. प्र. ब. व.

पाण्डवः पाण्डू पुत्रांनी पाण्डव पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

एव सुद्धा अव्यय

किम् काय किम् नपु. द्वि. ए. व.

अकुर्वत केले कृ धातू कर्तरि लङः लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

श्रीमद्भगवद्गीतेच्या 13 व्या अध्यायात क्षेत्र क्षेत्रज्ञ संबंधी विस्तृत माहिती दिली आहे. ह्या श्लोकात धर्मक्षेत्र आणि कुरुक्षेत्र असे दोन शब्द वापरले आहेत. प्रामुख्याने लढाई होण्याची कारणे भूमी संपत्ती आणि स्त्री अशीच दिसून येतात. येथे भूमी च्या मालकी हक्कावरून युद्धाचे कारण आहे. युद्ध टाळण्याचे अनेक प्रयत्न असफल झाल्यानंतर आता युद्धाला सुरवात होणार आहे. कोणतेही कार्य धर्माला अनुसरून करावे असा उपदेश पुढे वाचायला मिळतो.

राजा धृतराष्ट्र, संजयाच्या आधारे युद्धभूमीवरील घडामोडी पाहणार आहे.

त्यामुळेच

राजा धृतराष्ट्र, संजयाला संबोधून असे म्हणतात की

हे संजय! धर्मभूमी कुरुक्षेत्रावर युद्धाच्या इच्छेने जमलेल्या माझ्या पुत्रांनी आणि पाण्डू पुत्रांनी काय केले?

---

**सञ्जय उवाच**

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा।**

**आचार्यमुपसङ्गम्य राजा वचनमब्रवीत्।।1.2।।**

सञ्जयः उवाच - तदा तु राजा दुर्योधनःव्यूढम् पाण्डव-अनीकम् दृष्ट्वा, आचार्यम् उपसङ्गम्य, (इदं) वचनम् अब्रवीत्॥

सञ्जयः उवाच

तदा तेव्हा अव्यय

तु परन्तु अव्यय

राजा राजन् पु. प्र. ए. व. दुर्योधनः दुर्योधन पु. प्र. ए. व.

व्यूढम् व्यूहरचना व्यूढ पु. द्वि. ए. व.

वि +वह् धातू प्रवाहित करणे

पाण्डव-अनीकम् पाण्डव- सेना

पाण्डव-अनीकम् पु. द्वि. ए. व.

अन धातू समर्थ असणे

दृष्ट्वा पाहून

दृश् धातू पाहणे क्त्वा प्रत्यय

आचार्यम् आचार्य पु. द्वि. ए. व.

उपसङ्गम्य, जवळ जाऊन

उप +सम +गम् धातू जाणे

सम +गम्  जवळ जाणे

वचनम् वचन नपु. द्वि. ए. व.

अब्रवीत् म्हणाला

ब्रू धातू बोलणे कर्तरि लङः लकार प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकात आचार्य म्हणजे द्रोणाचार्य यांच्या जवळ दुर्योधन गेला आहे असे पाहून आता संजयाने उत्तर देण्यास सुरुवात केली आहे.

द्रोणाचार्य कौरव आणि पांडव दोघांचेही गुरू होते. अर्जुन त्यांचा विशेष लाडका शिष्य. एकलव्याची कथा आपल्या सर्वांनाच माहीत आहे. ह्या श्लोकात संजय धृतराष्ट्राला असे सांगत आहेत की

परन्तु तेव्हा राजा दुर्योधनाने पांडव सेनेची रचना पाहून आचार्यांच्या जवळ जाऊन बोलण्यास सुरवात केली.

---

**पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम्।**

**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता।।1.3।।**

हे आचार्य! तव धीमता शिष्येण, द्रुपद-पुत्रेण व्यूढाम् पाण्डु-पुत्राणाम् एताम् महतीम् चमूम् पश्य ।

हे आचार्य!

तव तुमचा युष्मद् ष. ए. व.

धीमता बुद्धिने धीमत् पु. तृ ए. व.

शिष्येण शिष्याने शिष्य पु. तृ. ए. व.

द्रुपद-पुत्रेण (धृष्टद्युम्न) द्रुपद-पुत्र पु. तृ. ए. व.

व्यूढाम् रचना व्यूढा स्त्री द्वि. ए. व.

पाण्डु-पुत्राणाम् पांडवांची पाण्डु पुत्र पु. ष. ब. व.

एताम् ह्याची एतद्  स्त्री. द्वि. ए. व.

महतीम् विशाल महती स्त्री. द्वि. ए. व.

चमूम् युद्ध सेना चमू स्त्री. द्वि. ए. व.

पश्य पहा दृश् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

धृष्टद्युम्न च्या जन्माची कहाणी सर्वांना माहित आहेच. धृष्ट धातू चा अर्थ घमंड असणे. ज्याचा जन्मच मुळी द्रोणाचार्यांचा वध करण्यासाठी झाला होता. हे माहीत असूनही त्याला द्रोणाचार्यांनी आपला शिष्य केला होता. आता युद्धभूमीवर धृष्टद्युम्न पांडवांच्या बाजूने लढत आहे.

आता संजय धृतराष्ट्राला पुढे असे सांगत आहेत की

(दुर्योधन द्रोणाचार्यांना असे म्हणत आहे की)

हे आचार्य! तुमचा बुद्धिमान शिष्य द्रुपदपुत्रा द्वारे रचलेली पाण्डु पुत्रांची ही विशाल सेना पहा.

---

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि।**

**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः।।1.4।।**

अत्र, महा-इषु-आसाः युधि, भीम-अर्जुन-समाः शूराः युयुधानः विराटः, महारथः च द्रुपदः च।

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान्।**

**पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः।।1.5।।**

धृष्टकेतुः, चेकितानः च, वीर्यवान् काशिराजः च, पुरुजित् कुन्तिभोजः च, नर-पुङ्गवः शैब्यः च।

**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान्।**

**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः।।1.6।।**

विक्रान्तः युधामन्युः च, वीर्यवान् उत्तमौजाः सौभद्रः च, द्रौपदेयाः च, सर्वे महारथाः एव

अत्र, येथे अव्यय

महत् इष्वासाः महान धनुर्धारी

महत् इष्वास पु. प्र. ब. व.

महा- महान

इषु- बाण

आसाः आस धनुष्य

युधि युद्धात युध् स्त्री स. ब. व.

भीम-अर्जुन-समाः भीम अर्जुन सम पु. प्र. ब. व.

सम प्रमाणे

शूराः शूर पु. प्र. ब. व.

युयुधानः युयुधान पु. प्र. ए. व.

विराटः विराट पु. प्र. ए. व.

महारथः महारथी महान् रथ पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

द्रुपदः द्रुपद पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

धृष्टकेतुः धृष्टकेतु पु. प्र. ए. व.

चेकितानः चेकितान पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

वीर्यवान् बलवान

वीर्यवान् पु. प्र. ए. व.

काशिराजः काशिराज पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

पुरुजित् पुरुजित् पु. प्र. ए. व.

कुन्तिभोजः कुन्तिभोज पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

नर-पुङ्गवः नर श्रेष्ठ

नर-पुङ्गव पु. प्र. ए. व.

शैब्यः शैब्य पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

विक्रान्तः पराक्रमी विक्रान्त पु. प्र. ए. व.

युधामन्युः युधामन्यु पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

वीर्यवान् शक्तीमान वीर्यवान् पु. प्र. ए. व.

उत्तमौजाः उत्तमौजा उत्तमौजस् पु. प्र. ए. व.

उत्तम ओजस्, ओजस् - तेज, बळ

सौभद्रः सुभद्रेचा मुलगा

च, आणि

द्रौपदेयाः द्रौपदी ची मुले

द्रोपदेय पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

महारथाः  महारथी पु. प्र. ब . व.

एव नक्कीचअव्यय

युध्द धातू +कानच् प्रत्यय= युयुधान म्हणजे सात्यकी

यादवकुलीन राजा आणि पांडवांच्या बाजूचा सरदार. कृष्णाचे सैन्य कौरवांच्या बाजूने आणि कृष्ण पांडवांच्या बाजूचा हे आपापल्या माहित आहे. पण सात्यकी अर्जुनाचा शिष्य होता त्यामुळे तो पांडवांच्या बाजूने लढत होता.

पांडव अज्ञातवासाच्या काळात वास्तव्यास असलेल्या विराट नगरी चा विराट राजा, उत्तरेचे पिता, युद्धात पांडवांच्या बाजूने लढत होते. वि+राज धातू प्रकाशित होणे. विराट म्हणजे विशाल.

द्रुपद, पांचाल देशाचा राजा, द्रौपदी, धृष्टद्युम्न आणि शिखंडी चा पिता.

धृष्टकेतु वृष्णि वंशीय यादव, शिशुपाल चा पुत्र, चेदी देशाचा राजा, चेकितान चे पिता. धृष्टकेतु श्रीकृष्णांचा भक्त होता असे म्हणतात.

चेकितान चा अर्थ ज्ञानी.

काशी नगरीवर राज्य करणारे सारेच काशीराज. आपल्याला काशीराजांच्या कन्या अंबा, अंबिका आणि अंबालिका ज्यांना पितामह भीष्म यांनी हस्तिनापुरास जिंकून आणले होते हे माहीत आहे.

पुरुजित आणि कुन्तिभोज हे माता कुंतीचे भाऊ म्हणजे पांडवांचे मामा.

शिबिदेशाचे राजे शैब्य ज्यांना नरपुंगव म्हणजे नरामधे श्रेष्ठ असे म्हणतात. यांची पुत्री देविका चा विवाह युधिष्ठिरांशी झाला होता.

युधामन्यु आणि उत्तमौजा पांचाल देशाचे राजपुत्र, ह्यांना अनुक्रमे विक्रांत आणि वीर्यवान अशा विशेषणांनी संबोधले आहे.

सौभद्र, सुभद्रा चा पुत्र अभिमन्यू चे दुसरे नाव.

प्रतिबिन्ध्य, सुतसोम , श्रुतकर्मा , शतानीक आणि श्रुतसेन हे अनुक्रमे युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल आणि सहदेव यांचे द्रौपदेय म्हणजे द्रौपदी पुत्र.

आधीच्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे राजा दुर्योधन, द्रोणाचार्यांच्या जवळ जाऊन पांडव सेनेचे वर्णन करत आहे. ह्या श्लोकात त्याचे वर्णन संजय धृतराष्ट्रांना सांगत आहेत.

ते असे.

येथे युद्धात भीम आणि अर्जुनासारखेच शूर  धनुर्धारी आहेत. युयुधान, राजा विराट, आणि द्रुपद सारखे महारथी.

धृष्टकेतू, चेकितान, बलशाली काशिराज, पुरुजित, कुंतिभोज आणि नर श्रेष्ठ शैब्य यांच्यासारखे  योद्धे आहेत. तसेच पराक्रमी युधामन्यू, अत्यंत शक्तिशाली उत्तमौजा, सुभद्रापुत्र आणि द्रौपदीचे पुत्र आहेत. हे सर्व योद्धे महारथी लढवय्ये आहेत.

---

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम।**

**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते।।1.7।।**

हे द्विज-उत्तम! अस्माकम् ये विशिष्टाः, मम सैन्यस्य नायकाः, तान् तु निबोध। ते संज्ञार्थम् तान् ब्रवीमि।

हे द्विज-उत्तम! द्रोणाचार्य

अस्माकम् आपल्या अस्मद् ष. ब. व.

ये  जे यद् पु. प्र. ब. व.

विशिष्टाः विशेष महत्वाचे विशिष्ट पु. प्र. ब. व.

मम माझ्या अस्मद् ष. ए. व.

सैन्यस्य सैन्याचे सैन्य पु. ष. ए. व.

नायकाः सेनापती नायक पु. प्र. ब. व.

नि धातू प्राप्त करणे

तान् ते तद् पु. द्वि. ब. व.

तु सुद्धा अव्यय

निबोध समजून घ्या

नि +बुध धातू समजून घेणे

ते तुमच्या युष्मद् ष. ए. व.

संज्ञार्थम् विशिष्ट माहिती

संज्ञा +अर्थ पु. द्वि. ए. व.

सम+ज्ञा धातू समजून घेणे

तान् ते तद् द्वि ब. व.

ब्रवीमि सांगतो ब्रू धातू बोलणे कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

पांडवांच्या सैन्याचे वर्णन करून झाल्यावर राजा दुर्योधनाने आता आचार्य द्रोणाचार्यांना हे द्विजोत्तम असे संबोधून बोलण्यास सुरुवात केली आहे. जन् धातू उत्पन्न होणे. ज्याचा दोन वेळा जन्म झाला आहे तो द्विज. अशा द्विज मध्ये उत्तम तो द्विजोत्तम,म्हणजे आचार्य द्रोणाचार्य.

संजय आता राजा धृतराष्ट्रांना असे सांगत आहेत की दुर्योधनाने आचार्य द्रोणाचार्यांना म्हटले

हे द्विजोत्तम! (जसे पांडवांच्या सैन्यात महारथी योद्धे आहेत तसेच) आपल्या सैन्यात ही खास असे माझे सेनापती आहे, त्यांना तुम्ही जाणून घ्या. आपल्या माहितीसाठी मी त्यांच्या बद्दल तुम्हाला सांगतो.

---

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिञ्जयः। अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च।।1.8।।**

भवान् भीष्मः च, कर्णः च, समितिञ्जयः कृपः च, तथा एव अश्वत्थामा विकर्णः, च सौमदत्तिः तथैव च ।

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः।**

**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः।।1.9।।**

अन्ये च बहवः शूराः नाना-शस्त्र-प्रहरणाः सर्वे युद्ध-विशारदाः मदर्थे त्यक्त-जीविताः ।

भवान् आपण भवत् पु. प्र ए. व.

भीष्मः भीष्म पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

कर्णः कर्ण पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

समितिञ्जयः युद्धात जिंकणारा  समितिञ्जय पु. प्र. ए. व.

सम-इति+जय

कृपः कृपाचार्य कृप पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

तथा एव तसेच अव्यय

अश्वत्थामा अश्वत्थामन् पु. प्र. ए. व.

विकर्णः, विकर्ण पु. प्र. ए. व.

च

सौमदत्तिः सोमदत्ति चा मुलगा भूरिश्रवा

तथैव तथा एव तसेच अव्यय

च सुद्धा अव्यय

अन्ये अन्य पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

बहवः अनेक बहु पु. प्र. ब. व.

शूराः शूर पु. प्र. ब. व.

नाना-शस्त्र-प्रहरणाः विविध शस्त्रे चालवू शकणारे नाना-शस्त्र-प्रहरण पु. प्र. ब. व.

प्र+हृ धातू मारणे

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

युद्ध-विशारदाः युद्धात पारंगत

युद्ध विशारद पु. प्र. ब. व.

मदर्थे माझ्या साठी अस्मद् अर्थ पु. स. ए. व.

त्यक्त-जीविताः जीव देण्यास तयार असणारे त्यक्त-जीवित पु. प्र. ब. व.

आचार्य द्रोण आणि भीष्म ह्यांच्या बद्दल आपल्याला माहीत आहे.

कृपाचार्य हस्तिनापूर राज्याचे कुलगुरू होते. त्यामुळे ते कौरव-पांडवांचे आद्य गुरू होते. त्यानंतर गुरू द्रोणाचार्य. ह्यांच्या बहिणीचा विवाह द्रोणाचार्यांशी झाला होता. ह्यांना चिरंजीवी मानतात कारण ह्यांच्या मृत्यू चा उल्लेख सापडत नाही. समितिञ्जयः हे विशेषण यम आणि विष्णू ह्यांच्या साठी वापरले जाते. युद्ध समाप्ती नंतर त्यांनी अभिमन्यु चा पुत्र, परीक्षिताला युद्ध विद्या प्रदान केली होती.

विकर्ण धृतराष्ट्रांचा 21 वा पुत्र, अतिशय न्यायप्रिय, विवेकी बुद्धीचा एकमेव असा द्रौपदी वस्त्रहरणाला विरोध करणारा कौरव, युद्धात भीमाकडून मारला गेला.

भूरिश्रवा, कौरव पांडवांचे काका, अतिशय शूर आणि न्यायप्रिय, युद्ध होऊ नये म्हणून आमरण उपोषण करणारे, मात्र श्रीभगवानकृष्णांच्या सल्ल्याने युद्धास तयार झालेले, सात्यकी च्या विरोधात असल्याने कौरवांच्या बाजूने लढले.

दुर्योधनाने आपल्या सैन्यातील महारथींचे वर्णन ह्या श्लोकात केले आहे. त्या बद्दल सांगताना संजय असे म्हणतात की

(दुर्योधन आचार्य द्रोणाचार्यांना असे म्हणत आहे की) स्वतः आपण, भीष्माचार्य, कर्ण, युद्धात जिंकणारे कृपाचार्य, अश्र्वत्थामा, विकर्ण आणि सोमदत्ति चा मुलगा आहेतच. ह्या व्यतिरिक्त अनेक शूरवीर, नाना प्रकारच्या शस्त्र चालवण्यात पारंगत असे युद्ध कुशल माझ्या साठी जीव देण्यास तयार आहेत.

---

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम्।**

**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम्।।1.10।।**

भीष्म-अभिरक्षितम् अस्माकम् तत् बलम् अपर्याप्तम्, भीम-अभिरक्षितम् एतेषाम् इदम् बलम् तु पर्याप्तम् ।

भीष्म-अभिरक्षितम् भीष्मांच्या द्वारे संचलित भीष्म अभिरक्षित पु. द्वि. ए. व.

अभि +रक्ष् धातू रक्षण करणे

अस्माकम् आपले

तत् ते नपु. प्र. ए. व.

बलम् सैन्यबळ बल नपु. प्र. ए. व.

अपर्याप्तम्, असीमित अपर्याप्त नपु. प्र. ए. व.

भीम-अभिरक्षितम् भीमाद्वारे संचलित भीम-अभिरक्षित नपु. प्र. ए. व.

एतेषाम् त्यांचे एतद् पु. ष. ब. व.

इदम्. हे नपु. प्र. ए. व.

बलम् सैन्यबळ बल नपु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

पर्याप्तम् पुरेसे पर्याप्त नपु. प्र. ए. व. परी+आप धातू प्राप्त करणे, मिळणे

परि +आप तृप्त करणे

हा श्लोक दुर्योधन स्वतःच्या मनाशी बोलत आहे की आचार्यांना सांगत आहे हे ठरवणे अवघड आहे. अपर्याप्तम् आणि पर्याप्तम् ह्या दोन शब्दांच्या अर्थात टीकाकारांमधे मतभेद आहेत. काही जणांना अपर्याप्तम शब्दाचा अर्थ 'असीमित' असा वाटतो, तर काही जणांना ह्याचा अर्थ 'असमर्थ ' असा वाटतो. पण कौरवांच्या सैन्याचे संख्याबळ पाहता वरकरणी तरी कौरवांची बाजू वरचढ दिसते. पांडवांचे सैन्य: 7 अक्षौहिणीस, 153,090 रथ आणि रथ-चालक, 153,090 हत्ती आणि हत्ती-चालक, 459,270 घोडे आणि घोडेस्वार, 765,450 पायदळ (एकूण 1,530,900 सैनिक)

कौरवांचे सैन्य 11 अक्षौहिणीस, 240,570 रथ आणि रथ-चालक,

240,570 हत्ती आणि हत्ती-चालक,

721,710 घोडे आणि घोडेस्वार, 1,202,850 पायदळ (एकूण 2,405,700 सैनिक). जर दुर्योधनाच्या मनात असीमित हा अर्थ असेल आणि तो आचार्यांना असे सांगत असेल तर त्याने श्रीभगवानकृष्णांचे खरे स्वरूप ओळखलेले नाही असे म्हणावे लागेल. किंवा ह्या मधून त्याचा मिजासखोर स्वभाव दिसून येत आहे.

जर असमर्थ असा अर्थ घेतला तर त्याचे युद्धनीती जाणण्याचे कौशल्य दिसून येते. कारण भीष्माचार्य जरी कौरवांच्या बाजूने असले तरी ते मनातून पांडवांच्या विरोधी नव्हते आणि दुसरे कारण म्हणजे स्वतः श्रीभगवानकृष्ण पांडवांच्या बाजूने आहेत.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

परन्तु भीष्मांद्वारे (उभयपक्षी असल्याने) संचलित आपली सेना असमर्थ (असीमित) आहे तर भीमाद्वारे संचलित सेना पुरेशी (सीमीत) आहे.

---

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः।**

**भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि।।1.11।।**

सर्वेषु अयनेषु च यथा-भागम् अवस्थिताः भवन्तः सर्वे एव हि भीष्मम् एव अभिरक्षन्तु।

सर्वेषु सर्वांनी सर्व नपु. स. ब. व.

अयनेषु मोक्याच्या जागांवर अयन नपु. स. ब. व.

अय धातू जाणे

च सुद्धा अव्यय

यथा-भागम् जसे नेमून दिले आहे तसे यथा भाग पु.

द्वि. ए. व.

अवस्थिताः स्थिर होऊन अव+स्था धातू स्थिर असणे क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

भवन्तः आपण भवत् पु. प्र. ब. व.

सर्वे सर्व सर्व पु. प्र. ब. व.

एव सुद्धा अव्यय

हि नक्कीच अव्यय

भीष्मम् भीष्म पु. द्वि. ए. व.

भी धातू भीती वाटणे +मक्, +षुक् प्रत्यय

एव सुद्धा अव्यय

अभिरक्षन्तु रक्षण करावे अभि+रक्ष् धातू रक्षण करणे कर्तरि लोट लकार प्र. पु. ब. व.

शिखंडी च्या जन्माची गोष्ट दुर्योधनाला सुद्धा माहित असण्याची शक्यता आहे. त्यामुळे आचार्य भीष्म यांची युद्धभूमीवर सुरक्षेची काळजी घेणे दुर्योधनाला महत्त्वाचे वाटत असावे. तो आता आपल्या सैन्यातील लोकांना उद्देशून असे म्हणत आहे की

आपण सर्वांनी आपल्या नेमून दिलेल्या जागांवर उभे राहून पितामह भीष्मांचे सर्व बाजूंनी रक्षण करावे.

---

**तस्य सञ्जनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः। सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान्।।1.12।।**

कुरु-वृद्धः प्रतापवान् पितामहः तस्य हर्षम् सञ्जनयन् , उच्चैः सिंहनादम् विनद्य शङ्खम् दध्मौ

कुरु-वृद्धः जेष्ठ कुरु कुरु-वृद्ध पु. प्र. ए. व.

प्रतापवान् पराक्रमी प्रतापवत् पु. प्र. ए. व.

पितामहः आजोबा पितामह पु. प्र. ए. व.

तस्य त्याच्या तद् पु. ष. ए. व.

हर्षम् (मनात) हर्ष पु. द्वि. ए. व.

सञ्जनयन् निर्माण होऊन सम+जन् धातू उत्पन्न होणे शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

उच्चैः उंच स्वरात अव्यय

सिंहनादम् सिंहनाद पु. द्वि. ए. व.

विनद्य गर्जना करून वि+नद् धातू नाद करणे ल्यप प्रत्यय

शङ्खम् शङ्ख पु. द्वि. ए. व.

दध्मौ फुंकला ध्मा धातू (फुंकून)ध्वनी निर्माण करणे कर्तरि लिट लकार प्र. पु. ए. व.

जंगलाचा राजा सिंह, शूरव्यक्तींना सिंहाची उपमा दिली जाते.

संस्कृत साहित्यात सिंहावर बरीच सुभाषिते वाचायला मिळतात.

नाभिषेको न संस्कार: सिंहस्य क्रियते मृगै:।

विक्रमार्जितराज्यस्य स्वयमेव मृगेन्द्रता॥

सिंहाचा राज्याभिषेक वा अन्य काही संस्कार प्राण्यांकडून केला जात नाही. पराक्रमाने राज्य मिळविलेल्या त्याचे प्राण्यांवरील राज्य स्वयंसिद्ध असते.

ह्या श्लोकात भीष्माचार्यांच्या शंखनादाला सिंहनाद अशी उपमा दिली आहे.

आधीच्या श्लोकात दुर्योधनाने दोन्ही बाजूच्या सैन्यबळाची चाचपणी केली. ह्या श्लोकात हर्ष असा शब्द वापरला आहे. युद्धभूमीवर युद्ध सुरू होण्यापूर्वी कोणाला आनंद कसा होईल? म्हणून त्याऐवजी स्फुरण वाढले असे म्हणता येईल. ह्या श्लोकात असे म्हटले आहे की

कौरवांतील जेष्ठ, पराक्रमी अशा पितामह भीष्मांनी स्फुरण निर्माण करत सिंहनादाप्रमाणे उच्च स्वरात शंख फुंकला.

---

**ततः शङ्खाश्च भेर्यश्च पन्वाणकगोमुखः।**

**सहसैवाभ्यहनन्त्य स शब्दस्तुमुलोऽभवत्।।1.13।।**

ततः शंखः भेर्यः च पणव-अंक-गोमुखः च सहसा एव अभ्यहन्यन्त । सः शब्दः तुमुलः अभवत्

ततः तेव्हा अव्यय

शंखः शंख पु. प्र. ब. व.

भेर्यः नगारे भेरी स्त्री प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

पणव-आनक-गोमुखाः ढोल मृदुंग शिंगे पणव-आनक-गोमुख पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

सहसा अचानक अव्यय

एव नक्की अव्यय

अभ्यहन्यन्त ओरडून बोलणे अभि+हन् धातू मारणे कर्मणि लङः लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

शब्दः शब्द  पु. प्र. ए. व.

तुमुलः व्याकुळ तुमुल पु. प्र. ए. व.

अभवत् झाले भू धातू कर्तरि लङः लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात भीष्माचार्यांनी शंखनाद केला असे म्हटले होते त्यानंतर कौरव सेनेने काय केले त्याचे वर्णन ह्या श्लोकात केले आहे. तुमुल शब्द, मराठीतील तुंबळ शब्दाची आठवण करून देतो.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

तत्पश्चात् शंख, नगारे, ढोल व श्रृंगी इत्यादि वाद्ये अचानक वाजू लागली त्यामधून घनघोर ध्वनी निर्माण झाले.

---

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ। माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शंखौ प्रद्धमतुः।।1.14।।**

ततः श्वेतैः हयैः युक्ते महति स्यन्दने स्थितौ माधवः पाण्डवः च दिव्यौ शङ्खौ प्रद्धमतुः एव

ततः त्यानंतर अव्यय

श्वेतैः पांढऱ्या श्र्वेत पु. तृ. ब. व.

हयैः घोड्यांना हय पु. तृ. ब. व.

हि धातू जाणे

युक्ते युक्त युज् धातू क्त प्रत्यय पु. स. ए. व.

महति विशाल महत पु. स. ए. व.

स्यन्दने रथात स्यन्दन पु. स. ए. व.

स्यन्द् धातू प्रसवणे

स्यन्द + युच् प्रत्यय

स्थितौ बसलेले स्था धातू क्त प्रत्यय पु. स. ए. व.

माधवः श्रीकृष्ण माधव पु. प्र. ए. व.

पाण्डवः अर्जुन पाण्डव पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

दिव्यौ अलौकिक दिव्य पु. द्वि. द्वि. व.

शङ्खौ शङःख पु. द्वि. द्वि. व.

प्रद्धमतुः वाजवले प्र+ध्मा धातू कर्तरि लिट लकार प्र. पु. द्वि. व.

एव सुद्धा अव्यय

पहिल्या श्लोकात राजा धृतराष्ट्रांनी विचारलेला प्रश्न, माझे पुत्र आणि पाण्डू पुत्रांनी काय केले? त्यापैकी कौरवांनी काय केले हे आपण आतापर्यंत वाचले. आता पाण्डु पुत्रांनी काय केले त्याचे वर्णन. अतीशय चपखल अशी शब्दरचना, हळूहळू श्रीमद्भगवद्गीतेचा गाभा उलगडून दाखवणारी. ह्या श्लोकात सफेद घोड्यांचा उल्लेख केला आहे. पांडव फक्त सफेद घोडेच वापरत होते की नाट्यकथांमधे विशिष्ट रंग विशिष्ट स्वभाव आणि व्यक्तीमत्व दर्शवतात असा काहीसा प्रकार आहे? संशोधनाला वाव आहे.

असे सुद्धा एक कथानक आहे की चित्ररथ गंधर्व ह्याने पांडवांना चक्षुषी विद्या शिकवली होती, तसेच 100 घोडे प्रदान केले होते ज्यांचे रंगरूप आपल्या इच्छेनुसार बदलता येत होते.

मधु शब्दापासून तयार झालेला शब्द माधव म्हणजे वसंत ऋतु किंवा गोडवा. धव म्हणजे पती, माधव म्हणजे लक्ष्मीपती.

विष्णु सहस्रनाम आणि नारद पंचरात्र ह्यावरील आदि शंकराचार्यांच्या टिप्पणी नुसार, ब्रह्मांडाची माता म्हणजे लक्ष्मीदेवी. माधव म्हणजे जो मधु-विद्येच्या माध्यमातून  जाणून घेण्यास योग्य आहे तो. ', ज्ञानाचा स्वामी.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

ह्या नंतर श्र्वेत घोडे जुंपलेल्या विशाल रथात बसलेल्या श्रीकृष्ण आणि अर्जुनाने आपले दिव्य शंख फुंकले.

---

**पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः। पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ।।1.15।।**

हृषीकेशः पाञ्चजन्यम् , धनञ्जयः देवदत्तम् , भीम-कर्मा वृक-उदरः महा-शंखम् पौण्ड्रम् दध्मौ ।

हृषीकेशः कृष्णाने हृषीकेश पु. प्र. ए. व.

पाञ्चजन्यम् पाञ्चजन्य नावाचा पाञ्चजन्य पु. द्वि. ए. व.

धनञ्जयः अर्जुनाने धनञ्जय पु. प्र. ए. व.

देवदत्तम् , देवदत्त नावाचा देवदत्त पु. प्र. ए. व.

भीम-कर्मा भीतीदायक कर्म करणारा भीम-कर्मन् पु. प्र. ए. व.

भी धातू भीती वाटणे म प्रत्यय

वृक-उदरः वृक नावाचा अग्नी पोटात असणारा वृक-उदर पु. प्र. ए. व.

महा-शंखम् महा-शंख पु. द्वि. ए. व.

पौण्ड्रम् पौण्ड्र नावाचा पौण्ड्र पु. द्वि. ए. व.

दध्मौ वाजवला ध्मा धातू कर्तरि लिट लकार. प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकात विविध शंखांची नावे दिलेली आहेत. शंखांमुळे नकारात्मक शक्ति नष्ट होतात असे म्हणतात म्हणजेच युद्धप्रसंगी मनाची चलबिचलता कमी होत असावी. शंखाचा आकार आणि रंग मनात पवित्र भावना उत्पन्न करतात, शिवाय ते शौर्याचे प्रतिक असून सर्व योद्धे आपापले शंख बाळगत असत. शंखचूड नावाच्या दैत्याचा वध महादेवांनी केला होता म्हणून भगवान शिव सोडून इतर देवतांवर शंखाने जल अर्पण करतात.

शंख प्रक्षालन, शंख मुद्रा तसेच आयुर्वेदामधे शंख पुष्पी, शंख भस्म वगैरे गोष्टी आपल्याला माहीत आहेत. प्राचीनकाली शंख लिपी सुद्धा होती असे म्हणतात. लक्ष्मी शंख, गोमुखी शंख, कामधेनु शंख, विष्णु शंख, देव शंख, चक्र शंख, पौंड्र शंख, सुघोष शंख, गरूड़ शंख, मणिपुष्पक शंख, राक्षस शंख, शनि शंख, राहु शंख, केतु शंख, शेषनाग शंख, कच्छप शंख, गोमुखी शंख, पांचजन्य शंख, अन्नपूर्णा शंख, मोती शंख, हीरा शंख, शेर शंख असे अनेक प्रकारचे शंख माहित आहेत.

ह्या श्लोकातील प्रत्येक शब्दाचा अर्थ समजून घ्यायला हवा.

पाञ्चजन्य नावाच्या शंखरूपी राक्षसाचा वध करून त्याच्या हाडांचा शंख बाळगणारा तो पाञ्चजन्य म्हणजे श्रीभगवानकृष्ण. त्यांना हृषीकेश म्हणतात. हृषिका म्हणजे इंद्रिये त्याचा शासक तो हृषीकेश.

राजसूय यज्ञात अनेक राजांचा पराभव करून अमाप संपत्ती गोळा करणारा अर्जुन म्हणजे धनंजय. संपत्ती जरी बाह्य गरजा पूर्ण करण्यासाठी आवश्यक असली तरी आत्मिक संपत्ती म्हणजे दैवी संपत्ती (ह्या बद्दल माहिती पुढिल अध्यायात आहेच) महत्त्वाची. बृहद-आरण्यक उपनिषदात याज्ञवल्क्य मैत्रेयी ला ह्या बद्दल सांगताना म्हणतात की पृथ्वीचे जरी स्वामीत्व असेल तरी त्यामुळे अमृतत्वाची प्राप्ती होत नाही, त्यासाठी आत्मिक संपत्तीच आवश्यक असते.

भीम सर्वात शक्तिशाली होता हे माहीत आहेच त्याच्या कृती मनात धडकी भरवणाऱ्या अशा भीमकर्मा. भीम वृक नावाचा अग्नी पोटात बाळगून होता म्हणून वृकोदर. त्याच्या महाविशाल अशा शंखाचे नाव होते पौण्ड्र.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

श्रीकृष्णांनी पाञ्चजन्य नावाचा, अर्जुनाने देवदत्त नावाचा आणि आपल्या नावाचा दरारा असणाऱ्या भीमाने पौण्ड्र नावाचा विशाल शंख फुंकला.

---

**अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः। नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ।।1.16।।**

कुंती-पुत्रः राजा युधिष्ठिरः अनंतविजयम् , नकुलः सहदेवः च सुघोष-मणि-पुष्पकौ ।

कुंती-पुत्रः कुंती-पुत्र पु. प्र. ए. व.

राजा राजन् पु. प्र. ए. व.

युधिष्ठिरः युधिष्ठिर पु. प्र. ए. व.

अनंतविजयम् कायम विजय मिळवून देणारा अनन्तविजय पु. द्वि. ए. व.

नकुलः नकुल पु. प्र. ए. व.

सहदेवः सहदेव पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

सुघोष-मणि-पुष्पकौ सुघोष मणिपुष्पक पु. द्वि . द्वि . व.

कुंती-पुत्र युधिष्ठिर युद्धात स्थिरबुद्धि असणारा, कायम नीतिधर्माने वागणारा म्हणून धर्मराज, त्याच्या शंखाचे नाव अनंतविजय (नेहमी धर्माचा विजय होतो असे सुचवले आहे)

आणि (माद्री व अश्विनीकुमार यांचे पुत्र)

नकुल आणि सहदेव यांनी अनुक्रमे सुघोष आणि मणिपुष्पक शंख वाजवले.

---

**काश्यश्च परमेश्वरसः शिखंडी च महारथः। धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः।।1.17।।**

परम-इषु-असः काश्यः च , महारथः शिखंडी च धृष्टद्युम्नः विराटः च, अपराजितः सात्यकिः च।

**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते। सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान्दध्मुः पृथक् पृथक् ।।1.18।।**

द्रुपदः द्रौपदेयाः च ,महा-बाहुः सौभद्रः च, सर्वशः पृथिवीपते पृथक् पृथक् शङ्खान् दध्मुः ।

परम-इषु-असः उत्कृष्ट धनुर्धारी परम इष्वास पु. प्र. ए. व.

काश्यः काशी राज काश्य पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

महारथः महारथी महारथ पु. प्र. ए. व.

शिखंडी शिखंडीन् पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

धृष्टद्युम्नः धृष्टद्युम्न पु. प्र. ए. व.

विराटः विराट पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अपराजितः अजिंक्य अपराजित पु. प्र. ए. व.

सात्यकिः सात्यकि पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

द्रुपदः द्रुपद पु. प्र. ए. व.

द्रौपदेयाः द्रौपदी चे पुत्र द्रौपदेय पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

महा-बाहुः विशाल बाहू महत् बाहु पु. प्र. ए. व.

सौभद्रः सौभद्र पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

सर्वशः सर्व बाजूंनी अव्यय

पृथिवीपते पृथ्वी चा शासक पृथिवीपति पु. सं. ए. व.

पृथक् पृथक् वेगळे वेगळे अव्यय

शङ्खान् शङ्ख शङ्ख पु. द्वि. ब. व.

दध्मुः वाजवले ध्मा धातू कर्तरि लिट लकार प्र. पु. ए. व.

आता ह्या दोन श्लोकात पाण्डव सेनेतील प्रमुख योद्ध्यांचा उल्लेख केला आहे.

श्रेष्ठ धनुर्धर काशीराज, महायोद्धा शिखंडी, धृष्टद्युम्न आणि विराट तसेच अजिंक्य असा सात्यकी, द्रुपद, द्रौपदी ची मुले, महाबलशाली सुभद्रापुत्र म्हणजे अभिमन्यू, अशा सर्वांनीच आपापले शंख वाजवले.

---

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यादरायत्। नभश्च पृथिवी चैव तुमुलो व्यनुनादयन।।1.19।।**

सः तुमुलः घोषः नभः च पृथिवीं च व्यनुनादयन एव , धार्त्रराष्ट्राणाम् हृदयानि व्यादरायत्।

सः त्या तद् पु. प्र. ए. व.

तुमुलः निनाद तुमुल पु. प्र. ए. व.

घोषः ध्वनी घोष पु. प्र. ए. व.

घू धातू आवाज करणे

नभः पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

पृथिवीं पृथ्वी पृथिवी स्त्री. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

व्यनुनादयन दुमदुमून टाकत वि+अनु+नद् धातू नाद करणे शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

एव नक्की अव्यय

धार्त्रराष्ट्राणाम् धृतराष्ट्र पुत्रांचे धार्त्रराष्ट्र पु. ष. ब. व.

हृदयानि हृदय नपु. द्वि. ब. व.

व्यादरायत् विदीर्ण केले वि+दृ धातू तुकडे करणे कर्तरि लङः लकार प्र. पु. ए. व.

एकीकडे विध्वंसक असे युद्ध चालू होणार आहे पण अधर्माच्या अंताची ती सुरुवात सुद्धा आहे. त्यामुळे एकाच शंखध्वनी चा वेगवेगळा परीणाम दिसून येणार आहे. जेव्हा जेव्हा संजय-धृतराष्ट्रांचे संवाद वाचायला मिळतात तेव्हा संजय आडून आडून, अगदी 18 व्या अध्यायातील शेवटापर्यंत धृतराष्ट्रांना युद्धासंबंधी पुनर्विचार करण्यास सुचवत आहे असे वाटते. ते पाण्डव सेना करत असलेल्या शंखध्वनी बद्दल  असे सांगत आहेत की

त्या शंखध्वनी च्या निनादामुळे कौरवांची छाती चिरत गेली आणि नभ आणि पृथ्वी दुमदुमून गेली.

---

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रानकपिध्वजः।प्रवृत्ते शस्त्रसंपते धनुर्द्यम्य पाण्डवः।।1.20।।**

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

अथ कपि-ध्वजः पाण्डवः व्यवस्थितान् धार्त्रराष्ट्रान् दृष्ट्वा , शस्त्र-सम्पते प्रवृत्ते धनुः उद्यम्य

तदा हृषीकेशम् इदम् वाक्यम् आह महीपते !

**अर्जुन उवाच**

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत।।1.21।।**

अर्जुनः उवाच - हे अच्युत ! मे रथम् उभयोः सेनयोः मध्ये स्थापय

अथ ह्या नंतर अव्यय

कपि-ध्वजः कपि ध्वज पु. प्र. ए. व.

पाण्डवः अर्जुनाने पाण्डव पु. प्र. ए. व.

व्यवस्थितान् नेमून दिलेल्या जागेवर असलेल्या व्यवस्थित पु. द्वि. ब. व.

अव+स्था धातू

धार्त्रराष्ट्रान् कौरवांना धार्तराष्ट्र पु. द्वि. ब. व.

दृष्ट्वा पाहून दृष् धातू क्त्वा प्रत्यय

शस्त्र-सम्पाते शस्त्रांचा वर्षाव करण्यास शस्त्र-सम्पात पु. स. ए. व.

सम+पत् धातू पडणे

प्रवृत्ते प्रवृत्त पु. स. ए. व.

धनुः धनुष्य धनुस् नपु. द्वि. ए. व.

उद्यम्य उचलून उद् धातू यम धातू ल्यप प्रत्यय

तदा तेव्हा अव्यय

हे महीपते ! हे राजन् (धृतराष्ट्र) महीपती पु. सं. ए. व.

हृषीकेशम् हृषीकेशांना उद्देशून हृषीकेश पु. द्वि. ए. व.

इदम् हे नपु. द्वि. ए. व.

वाक्यम् वाक्य पु. द्वि. ए. व.

आह म्हणाला ब्रू धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अर्जुनः उवाच -

हे अच्युत ! अ+च्युत

मे माझा अस्मद् ष. ए. व.

रथम् रथ पु. द्वि. ए. व.

उभयोः दोन्ही उभय पु. ष. द्वि. व.

सेनयोः सेना स्त्री. ष. द्वि. व.

मध्ये मध्य पु. स. ए. व.

स्थापय उभा कर स्था धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

कोणताही ध्वज कधीच स्थिर नसतो, तो कायमच हवेत फडकत असतो. कम्प धातू पासून तयार झालेला शब्द कपि म्हणजे वानर,  कपिध्वज म्हणजे अर्जुनाच्या ध्वजावर हनुमान विराजमान झाले आहेत, कारण हनुमानांनी अर्जुनाला तसे वचन दिले होते.

संजयाने आपले बोलणे पुढे चालू ठेवताना ते असे म्हणतात की

हे राजन्! त्यानंतर हनुमानाचे चिन्ह असलेला ध्वज घेतलेल्या अर्जुनाने युद्धासाठी नेमून दिलेल्या जागेवर उभ्या असलेल्या कौरवांना पाहून जेव्हा शस्त्रे उगारण्याची वेळ आली तेव्हा आपले धनुष्य उचलून हृषीकेशांना असे म्हटले, हे अच्युत! माझा रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागी उभा करा.

---

**यावदेतन्निरिक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान्।**

**कर्मया सह योद्धव्यमस्मिन्रंसमुद्यमे।।1.22।।**

यावत् योद्धु-कामान अवस्थितान् एतान् अहम् निरिक्षे ; अस्मिन् रं-समुद्यमे कैः सह माया योद्धव्यम् ?

यावत् जोपर्यंत अव्यय

योद्धु-कामान युद्धास उत्सुक योद्धु काम पु. द्वि. ब . व.

अवस्थितान् सज्ज असलेले अव+स्था धातू क्त प्रत्यय पु. द्वि. ब . व.

एतान् या एतद् पु. द्वि. ब . व.

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

निरिक्षे ; नीट पाहून घेईतो निर+ईक्ष धातू पाहणे कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

अस्मिन् ह्या इदम् पु. स. ए. व.

रण-समुद्यमे युद्ध संघर्षात रण समुद्यम पु. स. ए. व.

सम+उद+यम धातू नियंत्रण ठेवणे

कैः सह कोणाकोणाबरोबर किम् पु. तृ. ए. व.

सह बरोबर अव्यय

मया मला अस्मद् तृ. ए. व.

योद्धव्यम् लढायचे आहे युध् धातू तव्यत प्रत्यय पु. द्वि. ए. व.

आता ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना (आपल्या सारथी ला) रथ पुढे नेण्यास सांगत आहे. मात्र आधीच्या श्लोकात त्यांना अच्युत म्हणजे ज्याचे पतन होत नाही असे संबोधले होते.

अहं भक्तपराधीनो ह्यस्वतन्त्र इव द्विज।साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्तजनप्रियः।।

श्रीमद्भागवतम्-9.4.63

मी भक्तांच्या नियंत्रणाखाली आहे, मुळीच स्वतंत्र नाही. शुद्ध भक्तांच्या हृदयात विराजमान आहे, एवढेच नव्हे तर माझ्या भक्तांचे भक्त सुद्धा मला अत्यंत प्रिय आहेत.

मागील श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना रथ मध्यभागी उभा करण्यास सांगितले होते त्याचे स्पष्टीकरण देताना तो असे म्हणत आहे की

मी युद्धाच्या इच्छेने सज्ज झालेल्या सर्वांना नीट पाहून घेईन की मी कोणकोणाशी लढणे योग्य आहे, तोपर्यंत (रथ मध्यभागी उभा करा).

---

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः।**

**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकिर्षवः।।1.23।।**

युद्धे दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य प्रियचिकिर्षवः ये एते अत्र समागतः योत्स्यमानानां अहम अवेक्षे ।

युद्धे युद्धात युद्ध नपु. स. ए. व.

दुर्बुद्धेः दुर्बुद्धी स्त्री. ष. ए. व.

धार्तराष्ट्रस्य दुर्योधनाचे धार्तराष्ट्र पु. ष. ए. व.

प्रियचिकिर्षवः हित चिंतणारे प्रियचिकिर्षु पु. प्र. ब. व.

कृ धातू कर्तुम् इच्छूः

ये जे यद् पु. प्र. ब. व.

एते हे एतद् पु. प्र. ब. व.

अत्र येथे अव्यय

समागताः आले आहेत सम+आङः+गम धातू जाणे क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

योत्स्यमानानां युद्ध करणाऱ्यांना योत्स्यमान पु. द्वि. ब. व.

युध् धातू युद्ध करणे

अहम मी अस्मद् प्र. ए. व.

अवेक्षे अवलोकन करेन अव+ईक्ष धातू पाहणे कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

कौरव पांडवांचे युद्ध हे धर्मयुद्ध समजले जाते त्यामुळे कौरवांना साथ देणारे नक्की काय विचाराने दुर्योधनाला पाठिंबा देत होते ह्याचा विचार करणे फार महत्वाचे. त्याही वेळी आणि आजसुद्धा.

श्रीमद्भगवद्गीतेत दुर्बुद्धी ह्या शब्दाचे विवेचन सापडत नाही. मात्र दुर्योधन हे येऊ घातलेल्या विनाशाचे प्रतिक आहे. 18 व्या अध्यायातील 30,31,32 व्या श्लोकात अनुक्रमे सात्त्विक, राजसि आणि तामसी बुद्धीचे वर्णन केले आहे.

मग दुर्बुद्धी म्हणजे काय ? 2र्या अध्यायातील श्लोक 42 ते 44 यांवरील विश्लेषणात श्रीकृष्णांनी स्वर्गसुखाच्या इच्छेने यज्ञादि कर्मे करण्याला दुर्बुद्धी म्हटले आहे !

16 व्या अध्यायात दैवी गुण आणि आसुरी गुण ह्याबद्दल वाचावयास मिळते.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

दुष्टबुदधि दुर्योधनाचे हितचिंतक जे युद्धात युद्ध करण्यासाठी आले आहेत त्यांना मला पाहू दे.

---

**संजय उवाच**

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत।**

**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम्।।1.24।।**

संजय उवाच - हे भारत ! गुडाकेशेन एवम् उक्तः हृषीकेशः उभयोः सेनयोः मध्ये रथ-उत्तमम् स्थापयित्वा ।

**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षितम्।उवाच पार्थ पश्यतांसमेवतंकुरून्नीति।।1.25।।**

भीष्म-द्रोण-प्रमुखतः सर्वेषाम् महीक्षितम् च (रथोत्तम् स्थापयित्वा), हे ' पार्थ ! समवेतान् एतान् कुरुन् पश्य', इति (हृषिकेशः) उवाच ।

संजय उवाच - संजय म्हणाले

हे भारत ! हे धृतराष्ट्र

गुडाकेशेन अर्जुनाने गुडाकेश पु. तृ. ए. व.

एवम् असे अव्यय

उक्तः संबोधून वच् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

हृषीकेशः हृषीकेश पु. प्र. ए. व.

उभयोः दोन्ही उभ पु. ष. द्वि. व.

सेनयोः सैन्याच्या सेना स्त्री. ष. द्वि. व.

मध्ये मध्यभागी मध्य पु. स. ए. व.

रथ-उत्तमम् सर्वोत्तम रथ रथ-उत्तम पु. द्वि. ए. व.

स्थापयित्वा उभा केला स्था धातू क्त्वा प्रत्यय

भीष्म-द्रोण-प्रमुखतः भीष्म-द्रोण यांच्या समोर भीष्म-द्रोण-प्रमुखत पु. प्र. ए. व.

प्र+मुख+तस् प्रत्यय तोंडासमोर

सर्वेषाम् सर्व पु. ष. ब. व.

महीक्षितम् राजे महीक्षित पु. ष. ब. व.

महीम् क्षित

क्षि धातू निवास करणे

च  सुद्धा अव्यय

हे पार्थ ! हे अर्जुन

समवेतान् एकत्रित समवेत पु. द्वि. ब. व.

सम+एव+इ धातू जाणे

एतान् या एतद् पु. द्वि. ब. व.

कुरुन् कुरु वंशातील सदस्यांना कुरु पु. द्वि. ब. व.

पश्य पहा दृश् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

इति अव्यय

उवाच म्हणाले वच् धातू कर्तरि लिट लकार प्र. पु. ए. व.

हृषिकेश ह्या शब्दाचा अर्थ आधी आपण वाचला आहे.

आता गुडाकेश ह्या शब्दाचे दोन अर्थ समजून घेऊ. गुडा म्हणजे कुरळे केस.

गुडाका म्हणजे निद्रा. निद्रेचा स्वामी तो गुडाकेशे. ज्याने निद्रेवर म्हणजेच अज्ञानावर विजय मिळविला आहे असा. कठोपनिषदातील श्लोकाप्रमाणे शरीराला जर रथ असे मानले आणि मन म्हणजे आपल्या इन्द्रियांवर अंकुश ठेवणारा लगाम असे मानले तर ह्या श्लोकातील रथोत्तम ह्या शब्दाला वेगळाच अर्थ प्राप्त होतो. कुरु या शब्दाचा अर्थ कौरव आणि पांडव असा दोन्ही होतो. असे वाटते आहे की श्रीभगवानकृष्ण मुद्दामच अर्जुनाला कौरव पांडव एकाच वंशवृक्षाचे भाग आहेत, ह्याची जाणीव करून देत आहेत.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

संजय राजा धृतराष्ट्रांना असे सांगत आहेत की

हे भारत! अर्जुनाने असे म्हटल्यानंतर हृषीकेशाने दोन्ही सैन्याच्या मध्यभागी रथ आणून उभा केला. आणि भीष्म द्रोणाचार्य आणि इतर शासकांच्या समोर असे म्हटले की

हे पार्थ! येथे जमलेल्या सर्व कुरुवंशीयांना आता पहा.

---

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितृनथ पितामहान्।**

**आचार्यान्मातुलान्भ्रातृन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा।।1.26।।**

अथ पार्थः उभयोः सेनयोः अपि , तत्र स्थितान पितृन , पितामहन् , आचार्यान, मातुलान, भरतृन, पुत्रान, पौत्रान् तथा सखिन , शशुरान् सुहृदः, च एव अपश्यत्

अथ आता अव्यय

पार्थः पार्थ पु. प्र. ए. व.

उभयोः दोन्ही उभ पु. ष. द्वि. व.

सेनयोः सैन्यामध्ये सेना स्त्री. ष. द्वि. व.

अपि सुद्धा अव्यय

तत्र तेथे अव्यय

स्थितान स्थित असलेल्या स्था धातू क्त ष्ठा प्रत्यय पु. द्वि. ब. व.

पितृन पित्यांना पितृ पु. द्वि. ब. व.

पितामहन् आजोबांना पितामह पु. द्वि. ब. व.

आचार्यान, आचार्यांना आचार्य पु. द्वि. ब. व.

मातुलान, मामांना मातुल पु. द्वि. ब. व.

भरतृन, भावांना भ्रातृ पु. द्वि. ब. व.

पुत्रान, पुत्रांना पुत्र पु. द्वि. ब. व.

पौत्रान् नातवांना पौत्र पु. द्वि. ब. व.

तथा तसेच अव्यय

सखिन मित्रांना सखि पु. द्वि. ब. व.

श्वशुरान् सासऱ्यांना श्वशुर पु. द्वि. ब. व.

सुहृदः हितचिंतकांना सुहृद् पु. द्वि. ब. व.

च आणि अव्यय

एव नक्की अव्यय

अपश्यत् पाहिले दृश् धातू कर्तरि लङः लकार प्र. पु. ए. व.

श्रीभगवानकृष्णांनी रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागी अशा पद्धतीने उभा केला की अर्जुनाला दोन्ही बाजूचे लोक स्पष्टपणे दिसत आहे. ह्या श्लोकात पितृन असा शब्द वापरला आहे पण खरेतर कौरव आणि पांडव दोघांचेही पिता युद्ध भूमीवर नव्हते.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

आता पार्थाने दोन्ही सैन्यांमध्ये असलेल्या पितृतुल्य, आजे-पणजे, गुरू, मामा, भाऊ, मुलगे, नातू, मित्र, सासरे आणि हितचिंतक यांना सुद्धा पाहिले.

---

**तानस्मीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बंधूनवस्थितान्।**

**कृपया परयाविष्टो विषिदन्निदंबर्वीत् ॥1.27।।**

तान् समीक्ष्य सः कौन्तेयः सर्वान् बन्धून् अवस्थितान् ॥

कृपया परयाविष्टः विषीदन् इदम् अब्रवीत् ।

तान् त्या तद् पु. द्वि. ब. व.

समीक्ष्य पाहून सम+ईक्ष धातू ल्यप प्रत्यय

सः तो तद् पु. प्र. ए. व.

कौन्तेयः कौन्तेय पु. प्र. ए. व.

सर्वान् सर्व सर्व पु. द्वि. ब. व.

बन्धून् नातेवाईकांना बन्धू पु. द्वि. ब. व.

अवस्थितान् उभे असलेल्या अव+स्था धातू क्त प्रत्यय पु. द्वि. ब. व.

कृपया करूणेने कृपा स्त्री तृ. ए. व.

कृप् धातू दुर्बल होणे

परया आत्यंतिक परा स्त्री तृ. ए. व.

आविष्टः विवश होऊन आ+विष् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

विषीदन् विषाद करीत वि+सद् धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

इदम् असे इदम् नपु. द्वि. ए. व.

अब्रवीत् म्हणाला ब्रू धातू कर्तरि लङः लकार प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

त्या सर्व आपापल्या जागी स्थित असलेल्या गणगोतांना पाहून करूणा दाटून आलेल्या अर्जुनाने विवश होऊन विषादाने असे म्हटले.

---

**अर्जुन उवाच**

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥1.28॥**

**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**

**वेपुथश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥1.29 ॥**

अर्जुनः उवाच - हे कृष्ण ! समुपस्थितम् युयुत्सुम् इ मम स्वजनम् दृष्ट्वा मम गात्राणि सीदन्ति मुखम् परिशुष्यति च ।मे शरीरे वेपथुः च रोम-हर्षः च जायते ।

अर्जुनः उवाच -

हे कृष्ण !

समुपस्थितम् उपस्थित सम+उप+स्था धातू क्त प्रत्यय पु. द्वि. ए. व.

युयुत्सुम् युद्धोत्सुक असलेल्या युयुत्सु पु. द्वि. ए. व.

इमम ह्या सर्व इदम् पु. द्वि. ए. व.

स्वजनम् सगेसोयरे स्वजन पु. द्वि. ए. व.

दृष्ट्वा पाहून दृष् धातू क्त्वा प्रत्यय

मम माझ्या अस्मद् ष. ए. व.

गात्राणि अवयवांचा गात्र नपु. प्र. ब. व.

सीदन्ति शक्तीपात होत आहे सद् धातू शक्तीहीन होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

मुखम् मुख नपु. प्र. ए. व.

परिशुष्यति कोरड पडली आहे परि+शुष् धातू शुष्क होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

च सुद्धा अव्यय

मे माझ्या अस्मद् ष. ए. व.

शरीरे शरीराचे शरीर नपु. स. ए. व.

वेपथुः कंपन वेपथु पु. प्र. ए. व.

वेप् धातू कम्पन होणे +अथुच प्रत्यय

च सुद्धा अव्यय

रोम-हर्षः काटा उठणे रोमन हर्ष पु. प्र. ए. व.

रु धातू ध्वनी करणे

हृश् धातू आनंदी होणे

रोम्णः हर्षणः इव

च सुद्धा अव्यय

जायते जन धातू उत्पन्न होणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

अर्जुनाच्या मनात स्वजनांचा ओढवणारा मृत्यू, त्यामुळे निर्माण झालेली अपराधीपणाची भावना ह्या सर्वाचा त्याच्या शरीरावर होणारा परिणाम याचे वर्णन ह्या श्लोकात वाचायला मिळते.

अर्जुनाने असे म्हटले की

हे कृष्ण! युद्धासाठी उत्सुक असलेल्या स्वजनांचा पाहून मी गलितगात्र झालो आहे, माझ्या तोंडाला कोरड पडली आहे, शरीरात कंप जाणवतो आहे आणि अंगावर काटा आला आहे.

---

**गांडीवं स्रंसते हस्तात्त्वकच्चैव परिदह्यते । न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः।।1.30।।**

हस्तात् गांडीवम् स्रंसते , त्वक् च परिदह्यते एव ।

मे मनः भ्रमति इव अवस्थातुम् च न शक्नोमि

हस्तात् हस्त पु. पं. ए. व.

गांडीवम् गाण्डीव पु. प्र. ए. व.

स्रंसते  स्रंस् धातू पडणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

त्वक् त्वच् स्त्री. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

परिदह्यते परि+दह् धातू जाळून नष्ट करणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

एव सुद्धा अव्यय

मे अस्मद् ष. ए. व.

मनः मनस् नपु. प्र. ए. व.

भ्रमति भ्रम् धातू फिरणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

इव अव्यय

अवस्थातुम् अव+स्था धातू तुमून प्रत्यय

च सुद्धा अव्यय

न अव्यय

शक्नोमि शक् धातू शक्य होणेकर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

अर्जुनाच्या गाण्डीव धनुष्याबद्दल आपल्याला माहीत आहेच. हे ब्रह्मा ने निर्माण केले होते आणि खांडव वनात अग्नी देवांनी प्रसन्न होऊन ते अर्जुनाला दिले. ह्या संदर्भात एक श्लोक सापडतो.

सोऽग्निस्तुष्टो धनुरदाद्धयान् श्वेतान् रथं नृप। अर्जुनायाक्षयौ तूणौ वर्म चाभेद्यमस्त्रिभि: ॥ श्रीमद्भागवतम् 10.58.26॥

अग्नी देवांनी प्रसन्न होऊन धनुष्य, कधीही न संपणारे बाण, चिलखत आणि पांढऱ्या रंगाच्या घोड्यांची जोडी अर्जुनाला दिली.

आधीच्या श्लोकात अर्जुन आपल्या कमकुवत झालेल्या स्थितिचे वर्णन श्रीभगवानकृष्णांना सांगत असता आता त्यापुढे तो असे म्हणतो आहे की

माझ्या हातातून गाण्डीव गळून पडत आहे, त्वचेचा दाह होतो आहे, माझे मन थाऱ्यावर नाही आणि मला धडपणे उभे राहणे सुद्धा शक्य होत नाहीये.

---

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव। न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमहवे।।1.31।।**

हे केशव! विपरीतानि निमित्तानि च पश्यामि न च श्रेयः अनुपश्यामि हत्वा स्वजनम् अहवे॥

हे केशव!

विपरीतानि विपरीत नपु. द्वि. ब. व.

वि+परी+इ धातू जाणे

निमित्तानि लक्षणे निमित्त नपु. द्वि. ब. व.

नि+मिद् धातू क्त प्रत्यय

च सुद्धा अव्यय

पश्यामि दृश् धातू पाहणे कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

च सुद्धा अव्यय

श्रेयः कल्याण श्रेयस् नपु द्वि. ब. व.

श्रि धातू सेवा करणे

न अव्यय

न अनुपश्यामि दिसत नाही अनु+पश्यामि  दृश् धातू पाहणे कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

हत्वा मारून हन् धातू क्त्वा प्रत्यय

स्वजनम् स्वजनांना स्वजन पु. द्वि. ए. व.

आहवे युद्धात आहव पु. स. ए. व.

ह्वे धातू स्पर्धा करणे

एखादी गोष्ट घडण्यापूर्वी किंवा घडत असताना आजूबाजूला घडणाऱ्या घटना आपल्याला एक प्रकारचे संकेत देत असतात. त्यानुसार शुभ किंवा अशुभ, चांगले किंवा वाईट परिणाम दिसून येतात असे मानले जाते. जसे पशुपक्षांचा भीतीदायक आवाज, आकाशातून उल्का निखळून पडणे, भूकंप वगैरे. आधीच्या श्लोकात अर्जुनाने असेच नकारात्मक वर्णन आपल्या मानसिक आणि शारीरिक स्थितीचे केले होते.

त्यानुसार तो ह्या श्लोकात असे म्हणत आहे की

हे केशव! मला सर्व विपरीत लक्षणे दिसत आहेत. युद्धात आप्तांना मारून काही कल्याणकारी घडेल असे वाटत नाही.

---

**न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखनि च। किं नो राज्येन गोविंद किं भोगर्जिवितेन वा।।1.32।।**

हे कृष्ण! विजयम् न काङ्क्षे , न च राज्यं सुखनि च हे ! गोविंद नः राज्येन किम् भोगैः जीवितेन वा किम् ?

हे कृष्ण!

विजयम् विजयाची विजय पु. द्वि. ए. व.

काङक्षे, इच्छा काङक्ष धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी उ. पु. ए. व.

न अव्यय

च आणि अव्यय

राज्यम् राज्याची राज्य नपु. द्वि. ए. व.

सुखनि सुखाची सुख नपु. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

हे ! गोविंद

नः आम्हाला अस्मद् ष. ब. व.

राज्येन राज्याचा राज्य नपु. तृ. ए. व.

किम् काय किम् नपु. प्र. ए. व.

भोगैः उपभोगांचा भोग पु. तृ. ब. व.

भुज् धातू भोजने उपभोग घेणे

जीवितेन जगण्याचा जीवित नपु. तृ. ए. व.

जीव् धातू जगणे

वा अव्यय

किम् किम् नपु. प्र. ए. व.

काय मिळवले काय गमावले? आपलाच परीवार, सगेसोयरे यांना मारून राज्य मिळविल्यावर त्याचा आनंद तरी होईल का? त्याला सुख म्हणता येईल का? असा सारासार विचार अर्जुन करतोच आहे. तेच तो श्रीभगवानकृष्णांना सांगण्याचा प्रयत्न करत आहे. आधीच्या श्लोकात त्याला काही विपरीत घडत आहे असे वाटले होते आता

अर्जुन ह्या श्लोकात असे म्हणत आहे की

हे कृष्णा! (अशी युद्धात हानी झाल्यानंतर) अशा विजयाची, राज्याची आणि सुखाची मला इच्छा सुद्धा नाही. हे गोविन्द! अशा राज्याचा, त्याच्या उपभोगांचा आणि अशा आयुष्याचा आम्हाला काय लाभ होणार आहे?

---

**येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखनि च। त इमेऽवस्थिता युद्धे प्राणानस्त्यक्त्वा धनानि च।।1.33।।**

येषाम् अर्थे नः राज्यम् भोगः सुखनि च काङक्षितम्। ते इमे प्राणान धनानि च त्यक्त्वा , युद्धे अवस्थिताः ।

येषाम् ज्यांच्या यद् पु. ष. ब. व.

अर्थे साठी अर्थ पु. स. ए. व.

अर्थ धातू याचना करणे

नः आम्ही अस्मद् ष. ब. व.

राज्यम् राज्य नपु. प्र. ए. व.

भोगाः भोग पु. प्र. ब. व.

सुखनि सुखे सुख नपु. द्वि. ब. व.

च सुद्धा अव्यय

काङक्षितम् इच्छुक काङःक्ष धातू इच्छा करणे क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

इमे सर्व इदम् पु. प्र. ब. व.

प्राणान प्राण पु. द्वि. ब. व.

धनानि धन नपु. द्वि. ब. व.

धन् धातू उत्पन्न करणे

च सुद्धा अव्यय

त्यक्त्वा त्यागून त्यज् धातू क्त्वा प्रत्यय

युद्धे युद्धात युद्ध नपु. स. ए. व.

अवस्थिताः उभे आहेत अव+स्था धातू क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

प्राण म्हणजे चैतन्यशक्ती प्राण म्हणजे उर्जा,ज्याच्या शिवाय आपण जगूच शकत नाही. पंचप्राण, नाकी नऊ येणे असे शब्दप्रयोग आपल्याला माहीत आहेत, ते आपल्या शरीरात संचार करणाऱ्या निरनिराळ्या प्राणवायूंच्या आधारे निर्माण झाले आहेत.

आपल्या संस्कृतीत गुरूजनांच्या मातापित्यांच्या आदरापोटी आपण त्यांचे ऋणी असतो असे मानतो. त्या ऋणातून मुक्त होण्यासाठी कोणत्या ना कोणत्या पद्धतीने आपण यथाशक्ती सेवा करतो. कारण त्यांनी आपल्याला ह्या जगात जगण्यासाठी लायक बनवलेले असते. अर्जुनाची परीस्थिती इतकी विचित्र आहे की तेच गुरूजन त्याच्या विरुद्ध लढण्यासाठी उभे आहेत. लहान मुलांना खेळणी, मोठ्यांना महागड्या वस्तू केवळ दुसऱ्यांकडे आहेत म्हणून घ्याव्याशा वाटतात. अशा अंगाने सुद्धा ह्या श्लोकाचा अर्थ लावायला हरकत नाही. अर्जुनाला सुद्धा असेच काहीसे वाटले असावे.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

आम्ही ज्यांच्या साठी राज्य उपभोग आणि सुखांची इच्छा करत आहोत तेच सर्वजण त्यांच्या संपत्तीची आणि जीविताची आशा सोडून युद्धासाठी उभे ठाकले आहेत.

---

**आचार्याः पितरः पुत्रस्तथैव च पितामहः। मातुलाः श्वशुराः पौत्राः शिलाः संबंधिनस्तथा।।1.34।।**

आचार्याः पितरः पुत्राः , तथा एव च पितामहः

मातुलाः , श्वशुराः , पौत्राः , श्यालाः , तथा संबंधिनः

**एतन्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन। अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ।।1.35।।**

हे मधुसूदन ! घ्नतः अपि एतान् , हन्तुम न इच्छामि।

त्रैलोक्य-राज्यस्य अपि हेतोः (हंतुम् न इच्छामि), महीकृते किम् नु

आचार्याः गुरूजन आचार्य पु. प्र. ब. व.

पितरः काका पितृ पु. प्र. ब. व.

पुत्राः मुलगे पुत्र पु. प्र. ब. व.

तथा एव त्याचप्रमाणे तथैव अव्यय

च सुद्धा अव्यय

पितामहाः आजोबा पितामह पु. प्र. ब. व.

मातुलाः मामा मातुल पु. प्र. ब. व.

श्वशुराः सासरे श्वशुर पु. प्र. ब. व.

पौत्राः नातू पौत्र पु. प्र. ब. व.

श्यालाः मेव्हणे श्याल पु. प्र. ब. व.

तथा तसेच अव्यय

संबंधिनः आप्त संबन्धिन् पु. प्र. ब. व.

हे मधुसूदन !

घ्नतः मारून हन् धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

एतान् ह्या सर्वांना एतद् पु. द्वि. ब. व.

हन्तुम मारण्याची हन् धातू तुमून प्रत्यय

न इच्छामि इच्छा नाही इष् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

त्रैलोक्य-राज्यस्य तिन्ही लोकांच्या राज्याच्या त्रैलोक्य-राज्य नपु. ष. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

हेतोः हेतूने हेतु पु. पं. ए. व.

महीकृते पूजनीय अशा पृथ्वी साठी महीकृत पु. च. ए. व.

मह् धातू पूजा करणे

किम् काय किम् नपु. प्र. ए. व.

नु फक्त अव्यय

अर्जुनासमोर कोणकोण युद्धासाठी उभे आहेत ह्याची पूर्ण यादी त्याने सादर केली आहे. एखाद्याला मारण्यासाठी काहीतरी ठोस कारण हवे म्हणजे त्याचा नीचपणा. नाहीतर स्वतःचा स्वार्थ. अर्जुनाला नेमका हाच मुद्दा सतावतो आहे. श्रीभगवानकृष्णांना, हे मधुसूदन असे संबोधून, त्यांनी दैत्याची हत्या केली होती अशी आठवण करून देत, अर्जुनाने माझ्या समोर उभे असलेले माझे नातेवाईक आणि गुरूजन दैत्य नाहीत असा विचार सुद्धा मांडला आहे असे वाटते. खरे तर त्या सर्वांचे सुद्धा पांडवांशी काही खास वैर असे नाही, केवळ बांधीलकी च्या नात्याने दुर्योधनाच्या बाजूने ते लढत आहेत इतकेच.

ह्या दोन श्लोकांचा थोडक्यात अर्थ असा की

गुरुजन, काका, मुलगे, आजे, मामा, सासरे, नातू, मेहुणे, त्याचप्रमाणे इतर आप्त (युद्धासाठी उभे) आहेत . हे मधूसूदन! त्यांनी माझ्यावर वार केले तरी मी त्यांना मारू इच्छित नाही, अगदी तिन्ही लोकाचे राज्य मिळाले तरी नाही तर पृथ्वीची काय कथा?

---

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्ज्नार्दनः।**

**पापमेवाश्रयेदसमान्हत्वैतानाततयिनः।।1.36।।**

हे जनार्दन! धार्तराष्ट्रान् निहत्य नः का प्रियः स्यात्?

अततायिनः एतान् हत्वा पापम् एव अस्मान् आश्रयते ।

हे जनार्दन! सर्व जीवांचे पालनकर्ता

धार्तराष्ट्रान्  कौरवांना धार्तराष्ट्र पु. द्वि. ब. व.

निहत्य मारून नि +हन् धातू मारणे ल्यप प्रत्यय

नः आम्हाला अस्मद् ष. ब. व.

का काय किम् स्त्री. प्र. ए. व.

प्रितिः प्रसन्नता प्रिति स्त्री. प्र. ए. व.

स्यात् होईल अस् धातू असणे कर्तरि विधीलिङः लकार प्र. पु. ए. व.

आततायिनः आततायींना आततायिन् पु. द्वि. ब. व.

आ+तन् धातू ताणणे आतन्+इ धातू जाणे आतनि

एतान् ह्या एतद् पु. द्वि. ब. व.

हत्वा मारून हन् धातू मारणे क्त्वा प्रत्यय

पापम् पाप नपु. द्वि. ए. व.

एव सुद्धा अव्यय

अस्मान् आम्हाला अस्मद् द्वि. ब. व.

आश्रयते लागेल आङः+श्रि धातू सेवा करणे कर्तरि विधीलिङः लकार प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकातील आततायिन् ह्या शब्दाचे 6 प्रकार सांगितले आहेत.

अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारहरश्चैव षडेते आततायिनः।।-(वशिष्ठ-स्मृति 3/19)

आग लावणे, विष देणे, शस्त्रांचा दुरूपयोग, दूसर्यांची  संपत्ती हिसकावून घेणे, जमीनीवर कब्जा, पर-स्त्री चे अपहरण हे सर्व आततायी आहे.

अशा आततायींचे काय करावे?

गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम्।आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् ।।मनुस्मृति 8/350

आततायी हा गुरु असेल नाहीतर बालक,वृद्ध किंवा बहुश्रुत-ब्राह्मण, कसलाही विचार न करता त्याला संपवणे योग्यच.

अहिंसा परम धर्म ह्या वचनानुसार कोणाचीही हत्या करणे वाईट. एखादा माणूस पापी आहे किंवा नाही हे कसे ठरवायचे, कोणी ठरवायचे. चांगल्या वाईटाचा निवाडा राजदरबारातच होणार ना.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

हे जनार्दन! धृतराष्ट्र पुत्रांना मारून आम्हाला कोणती प्रसन्नता लाभेल? ह्या आततायींना मारून आम्हाला पापच लागेल.

**तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रानस्वबान्धवान्।**

**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव।।1.37।।**

माधव! तस्मात् स्वबान्धवान् धार्तराष्ट्रान् हन्तुम वयम न अर्हाः। हि स्वजनम् हत्वा कथम् सुखिनः स्याम ?

हे माधव!

तस्मात् म्हणून तद् नपु. पं. ए. व.

स्वबान्धवान् आपल्याच बांधवांना स्व बान्धव पु. द्वि. ब. व.

धार्तराष्ट्रान् कौरवांना धार्तराष्ट्र पु. द्वि. ब. व.

हन्तुम मारून हन् धातू मारणे तुमून प्रत्यय

वयम आम्ही अस्मद् प्र. ब. व.

न अव्यय

न अर्हाः योग्य नाही अर्ह पु. प्र. ब. व.

अर्ह धातू योग्यता असणे

हि कारण अव्यय

स्वजनम् आपल्या च लोकांना स्वजन पु. द्वि. ए. व.

हत्वा मारून हन् धातू क्त्वा प्रत्यय

कथम् कसे अव्यय

सुखिनः सुखी सुखिन् पु. प्र. ब. व.

स्याम होऊ अस् धातू कर्तरि विधीलिङः उ. पु. ए. व.

महर्षी व्यासांनी श्रीभगवानकृष्णांची नावे अगदी समर्पक लिहिली आहेत. ह्या श्लोकात माधव म्हणजे लक्ष्मीपती म्हणजे वैभवाचे प्रतिक. अर्जुनासमोर खरेच खूप मोठा पेच निर्माण झाला आहे. राज्य मिळवण्यासाठी आपल्याच आप्तांची लढायचे कि कोणत्याही गोष्टींची अपेक्षा करणे सोडून देऊन शांतपणे आयुष्य जगायचे?

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

म्हणूनच हे माधव! आपल्याला बांधवांना, धृतराष्ट्र पुत्रांना आम्ही मारणे योग्य नाही. आपल्या च कुटुंबातील लोकांना मारून आम्ही सुखी कसे होऊ?

---

**यद्यपयेते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः।**

**कुलक्षयकृतं दोषं मित्रत्रोधे च पातकम्।।1.38।।**

यदि अपि लोभ-उपहत्- चेतसः एते कुल-क्षय-कृतम् दोषम् , मित्र-द्रोहे पातकम् च न पश्यन्ति

**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मानिवर्तितम्।**

**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन।।1.39।।**

हे जनार्दन ! कुल-क्षय-कृतम् दोषम् प्रपश्यद्भिः अस्माभिः अस्मात् पापात् निवर्तितम् कथम् न ज्ञेयम्

यद्यपि जरी यदि अपि अव्यय

लोभ-उपहत्- चेतसः लोभाने बुद्धी भ्रष्ट झालेले लोभ-उपहत्- चेतस् पु. प्र. ब. व.

उप+हन् धातू मारणे

एते हे एतद् पु. प्र. ब. व.

कुल-क्षय-कृतम् कुळाच्या नाशाने उत्पन्न होणाऱ्या कुल-क्षय-कृत पु. द्वि. ए. व.

दोषम् दोष पु. द्वि. ए. व.

मित्र-द्रोहे मित्र-द्रोह पु. स. ए. व.

पातकम् पातक पु. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

न पश्यन्ति पहात नाही दृश् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

हे जनार्दन !

कुल-क्षय-कृतम् कुळाच्या नाशाने उत्पन्न होणाऱ्या कुल-क्षय-कृत पु. द्वि. ए. व.

दोषम् दोष

प्रपश्यद्भिः जाणणार्या प्रपश्यत् पु. तृ ब. व.

प्र+दृश् धातू पाहणे

अस्माभिः आम्ही अस्मद् तृ. ब. व.

अस्मात् या इदम् नपु. पं. ए. व.

पापात् पापातून पाप नपु. पं. ए. व.

निवर्तितुम् परावृत्त होण्यासाठी नि+वृत् धातू तुमून प्रत्यय

कथम् का अव्यय

न अव्यय

ज्ञेयम् विचार केला पाहिजे ज्ञा धातू जाणणे यत् प्रत्यय नपु. प्र. ए. व.

क्षत्रिय धर्माचे पालन करण्याच्या नादात द्यूत क्रिडा किंवा युद्धाचे आव्हान नाकारणे शक्य नाही पण त्यातून निर्माण होणाऱ्या समस्यांचा विचार कोण करणार? अशा अहंकारी समजुती मोडूनच काढायला हव्या.

लोभी माणसाच्या स्वभावाची खासियतच आहे. स्वतःपुरती संपत्ती मिळवून झाली की सात पिढ्यांची सोय करून ठेवावीशी वाटते. मग त्यासाठी कितीही आटापिटा करावा लागला तरी हरकत नाही. अशाच प्रकारचे विचार अर्जुनाला  सतावत आहेत असे दिसून येत आहे.

ऋत्विक्पुरोहिताचार्यैर्मातुलातिथिसंश्रितैः।

बालवृद्धातुरैवैद्यैर्जातिसम्बन्धिबान्धवैः।। मनुस्मृति: 4.179

(धर्माच्या मार्गावरून चालणाऱ्या व्यक्तीने) यज्ञ करणारी व्यक्ती , पुरोहित, गुरु, मामा, आश्रित, बालक, वृद्ध, रोगी, वैद्य (वैद्य, वैद्य, शल्यचिकित्सक), स्वजन यांच्याशी कधीच वाद-विवाद करू नये.

ह्या दोन श्लोकांचा थोडक्यात अर्थ असा की

जरी लोभापायी बुद्धी भ्रष्ट झाल्यामुळे ह्यांना पूर्ण कुटुंबाचा होणारा नाश आणि मित्राशी वैर करण्याचे पातक दिसू शकत नाही तरी हे जनार्दन! असे कुटुंबाचा नायनाट होणारे दुष्परिणाम दिसत असून सुद्धा आम्ही ह्या पापापासून परावृत्त होण्याचा विचार का करू नये.

---

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः। धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत।।1.40।।**

कुल-क्षये सनातनाः कुल-धर्माः प्रणश्यन्ति, उत धर्मे नष्टे कृत्स्नम् कुलम् अधर्मः अभिभवति।

कुल-क्षये कुलाचा नाश झाल्यावर कुलक्षय पु. स. ए. व.

सनातनाः शाश्वत सनातन पु. प्र. ब. व.

कुल-धर्माः कुळधर्म कुलधर्म पु. प्र. ब. व.

प्रणश्यन्ति नाश होतात प्र+नश् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

उत आणि अव्यय

धर्मे धर्माच्या धर्म पु. स. ए. व.

नष्टे नाशाने नष्ट पु. स. ए. व. नश् धातू क्त प्रत्यय

कृत्स्नम् संपूर्ण कृत्स्न नपु. द्वि. ए. व.

कुलम् कुळात कुल नपु. द्वि. ए. व.

अधर्मः अधर्म पु. प्र. ए. व.

अभिभवति फोफावतो अभि+भू धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आपले कुटुंब म्हणजे पूर्ण संस्कृतीचा एक घटक असतो. असे सर्व घटकांचा समूह एखाद्या विशिष्ट नावाने ओळखला जातो. जसे हिंदू धर्म हा शब्द नंतर निर्माण झाला असे मानले तरी सनातन धर्म हा शब्द आपल्या तत्वज्ञानात सापडतो. जसे आत्म्याचे वर्णन करताना सनातन हा शब्द वापरला आहे.

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च। नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः।।श्रीमद्भगवद्गीता 2.24।।

सनातन म्हणजे शाश्वत. सना म्हणजे प्राचीन. अनादि.

तन प्रत्यय संबंध दर्शवतो.

सनातन धर्माचे वर्णन करणारा मनुस्मृति मधील श्लोक सर्वांनाच माहित आहे.

सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयान्न ब्रूयात् सत्यमप्रियम्।

प्रियं च नानृतं ब्रूयादेश धर्मः सनातनः ॥मनुस्मृति 4.138॥

युद्धापश्चात होणारे दुष्परिणाम फक्त त्या त्या कुटुंबाचा नाश करत नाही तर पूर्ण संस्कृतीवर त्याचा परिणाम होतो.

एकमेकांचे संबंध बिघडतात, नाती दुरावतात, राजकीय परिस्थिती बिघडते. आर्थिक हानि होते.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

कुळाचा नाश झाला की संस्कृती चा नाश होतो. आणि धर्म नष्ट झाल्याने कुटुंबात अधर्म पसरतो.

---

**अधर्माभिभवत्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः। स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसङ्करः।।1.41।।**

हे कृष्ण! अधर्म-अभिभवत् कुल-स्त्रियः प्रदुष्यन्ति । हे वार्ष्णेय ! स्त्रीषु दुष्टासु वर्ण-संकरः जायते

हे कृष्ण!

अधर्म-अभिभवत् अधर्माने प्रबळ अधर्मन् अभिभव पु. पं. ए. व.

कुल-स्त्रियः कुल-स्त्री स्त्री. प्र. ब. व.

प्रदुष्यन्ति दूषित होतात प्र+दुष् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

हे वार्ष्णेय !

स्त्रीषु स्त्री स्त्री.स. ब. व.

दुष्टासु दूषित दुष्टा स्त्री.स. ब. व.

वर्ण-संकरः अनैतिक संतती वर्ण-संकर पु. प्र. ए. व.

वर्णस्य सङःकरः

वृ धातू आच्छादने

सङः+कृ धातू संभ्रम करणे

जायते उत्पन्न होतो जन धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

युद्धात पुरूष मारले जातात आणि त्यांच्या मागे स्त्रीया आणि मुलांची आबाळ होते. पितृछत्र हरवते. कुटुंबाचा आधार संपतो. अधर्माचे प्राबल्य वाढते. आणि भ्रष्ट आचरण बोकाळते. ह्या श्लोकात अर्जुन युद्धाचे दुष्परिणाम सांगताना श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

हे कृष्ण! अधर्माचे प्राबल्य वाढले की त्याचा परीणाम कुटुंबातील स्त्रीयांवर होतो. अशा दूषित स्त्रीयांमुळे संभ्रमित संतती जन्माला येते.

---

**सङ्करो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च। पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः।।1.42।।**

सङ्करः कुल-घनानाम् कुलस्य च नरकाय एव लुप्त-पिण्ड-उदक-क्रियाः ; एषाम् पितरः हि पतन्ति ।

सङ्करः संभ्रमित सङ्करः पु. प्र. ए. व.

कुल-घ्नानाम् कुळाचा नाश करणारे कुलघ्न पु. ष. ब. व.

कुलस्य कुलाचे कुल नपु. ष. ए. व.

च सुद्धा अव्यय

नरकाय नरकात नरक पु. च. ए. व.

एव सुद्धा अव्यय लुप्त-पिण्ड-उदक-क्रियाः पिण्ड आणि उदक यापासून वंचित लुप्त-पिण्ड-उदक-क्रियाः. प्र. ब. व.

एषाम् यांचे इदम् पु. ष. ब. व.

पितरः पितर पितृ पु. प्र. ब. व.

हि कारण अव्यय

पतन्ति अधोगतीला जातात पत् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

उदक क्रिया, पिंड अशा शब्दांमुळे, ह्या कर्म कांडांपासून वंचित असे म्हटल्यामुळे, भारतीय संस्कृतीत मुलगा म्हणजे वंशाचा दिवा, त्यामुळे प्रत्येकास मुलगा असायलाच हवा ही कल्पना ह्या श्लोका मुळे आली असावी का? असे वाटते. अजुनही मृत्यूपश्चात जगाचे आपल्याला फारसे आकलन झालेले नाही. आधीच्या जन्मात मिळवलेले ज्ञान पुढील जन्मी दिसून येते ह्यावर विश्वास बसू शकतो पण त्याची वैज्ञानिक कारणमिमांसा उपलब्ध नाही. उदक आणि पिंडदान हे प्रतिकात्मक आहे असे मानले तर त्याच्या मागची भूमिका समजून घ्यायला वाव आहे. आधीच्या श्लोकाचा धागा पकडून संभ्रमित संततीला कुटुंबाचा वारसा सांगता येत नाही. आपले पूर्वज आणि त्यांचे कर्तुत्व हे पुढील पिढी ला समान धाग्यात बांधून ठेवते. पूर्वजांच्या कर्तुत्वाचा वारसा पुढील पिढीला आपले पारिवारिक उत्तरदायित्व अधोरेखित करून सांगत असते. हेच सूत्र आपल्याला देशव्यापी पातळीवर समान संस्कृती आणि आपला प्राचीन वारसा ह्या प्रती दिसून येते . पण जे संभ्रमित परीस्थितीत आहेत त्यांचे काय? यांची सन्याशांशी तुलना करता येईल का? कारण संन्यासी सुद्धा आपले पारिवारिक दायित्व मानत नाहीत पण ते परमेश्वराला शरण गेलेले असतात. परमात्म्याचा अंश तर सर्वांमध्येच आहे.

एक खूप चांगला श्लोक भागवतपुराणात वाचायला मिळतो.

देवर्षि-भूताप्त-नृणां पितृणां

न किंकरो नायं ऋषि च राजन् ! सर्वात्मना यः शरणं शरण्यं गतो मुकुंदं परिहृत्य कर्तम् ।श्रीमदभागवत 11.5.41।।

ह्या श्लोकाचा विस्ताराने अभ्यास करायला हवा. पण थोडक्यात अर्थ हाच की

जो परमेश्वराला शरण गेला तो कोणाचा सेवक नाही, त्याच्यावर कोणाचे ऋण नाही. जसे पितर, देव आणि ऋषी यांचे आपल्यावर ऋण असते.

हे सर्व लिहीताना एका गाण्याच्या ओळी आठवल्या.

जगी ज्यास कोणी नाही त्यास देव आहे..

आता ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ पाहू. ज्यांनी युद्धात आपल्या कुळाचा संहार केला त्यांना कुलघातकी असे संबोधले आहे.

अर्जुन संभ्रमित संतती बद्दल पुढे असे म्हणत आहे की

संभ्रमित संतती कुळाचा नाश करणाऱ्यांना आणि कुळाला नरकातच नेतो. तसेच पिंडदान आणि उदक कर्म इत्यादींना मुकलेले यांचे पितर अधोगतीस जातात.

---

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसङ्करकारकैः।**

**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः।।1.43।।**

वर्ण-संकर-कारकैः एतैः दोषैः कुल-घनानाम् शाश्वताः जाति-धर्मः कुल-धर्मः च उत्साद्यन्ते।

वर्ण-संकर-कारकैः वर्ण सडःकर करणाऱ्या वर्ण-संकर-कारक पु. तृ. ब. व.

एतैः या एतद् पु. तृ. ब. व.

दोषैः दोषांमुळे दोष पु. तृ. ब. व.

कुलघ्नानां  कुलघाती लोकांचे कुलघ्न पु. ष. ब. व.

शाश्वताः सनातन शाश्वत पु. प्र. ब. व.

जाति-धर्माः जातीधर्म जाति-धर्म पु. प्र. ब. व.

कुल-धर्माः कुलधर्म कुलधर्म पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

उत्साद्यन्ते नष्ट होतात उत+सद् धातू कर्मणि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

महाभारतात अनेक प्रजातींचे उल्लेख आहेत, जसे राक्षस, गंधर्व अप्सरा, असुर, यक्ष, नाग आणि वानर. ह्यापैकी कोणाशीही युध्द असते तर आधीच्या श्लोकाचा अर्थ पूरेपूर पटला असता. वर्णसङ्कर हा शब्द येथे पूर्णतः लागू होतो. पण एकाच घरातील भावंडांच्या युद्धात वर्ण-संकर हा शब्द फारसा पटत नाही. कारण वर्णविचार हा चतुर्विध आहे.

माता सत्यवती हि एक मत्स्यकन्या होती. तसेच धृतराष्ट्र पंडू आणि विदुराची जन्मकथा आपल्याला माहीत आहेच. त्यामुळे वर्णसङ्कर हा केवळ अर्जुनाने मांडलेला मुद्दा आहे असे म्हणता येईल. वैदिक काळात जातींचा उल्लेख सापडत नाही. पण एकाच कुटुंबातील सदस्यांना, एकच व्यवसाय करणाऱ्या समूहाला काही विशिष्ट नावाने ओळखले जात असावे. त्यांच्या आपापल्या काही चालीरीती असाव्या, ज्यांना जातीधर्म असे म्हटले असावे.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

अशा वर्णसङ्करांच्या दोषांमुळे सनातनी कुलधर्म आणि जातीधर्म नष्ट होतात.

---

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन। नरकेऽनियतं वासो भवतित्यनुशुश्रुम्।।1.44।।**

हे जनार्दन ! उत्सन्न-कुल-धर्माणाम् मनुष्याणाम् नरके अनियतम् वासः भवति, इति अनुशुश्रुम् ।

हे जनार्दन !

उत्सन्न-कुल-धर्माणाम् ज्यांचा कुलधर्म नष्ट झाला आहे असा उत्सन्न-कुल-धर्म पु. ष. ब. व.

उद्+सद् धातू शक्तीहीन होणे

मनुष्याणाम् मनुष्य पु. ष. ब. व.

नरके नरक पु. स. ए. व.

अनियतम् अनिश्चितकाळापर्यंत अनियत पु. प्र. ए. व.

नियत यम् धातू प्रतिबंध असणे

वासः वास्तव्य वास पु. प्र. ए. व.

भवति होतो भू धातू होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

इति अव्यय

अनुशुश्रुम् ऐकण्यात आले आहे अनु+श्रु धातू ऐकणे कर्तरि लिट लकार उ. पु. ए. व.

मागच्या काही श्लोकात अर्जुन आणि श्रीभगवानकृष्णांचे अगदीच मित्रत्वाने संवाद चालू आहेत. अर्जुन त्याच्या मनातील निरनिराळ्या शंका बोलून दाखवत आहेत. ह्या श्लोकात तर ऐकीव माहिती वरील शंका बोलून दाखवली आहे. ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

हे जनार्दन! ज्यांचे कुलधर्म नष्ट होतात त्या माणसांचा अनंत काळापर्यंत नरकात वास्तव्य असते असे मी ऐकले आहे.

---

**अहो बत् महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्।**

**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः।।1.45।।**

अहो ! बत् , महत् पापम् कर्तुम् वयम् व्यवसिताः यत् राज्य सुख-लोभेन स्वजनम् हन्तुम उद्यताः ।

अहो ! आश्चर्य अव्यय

बत् , दुःख अव्यय

महत् मोठे महत् नपु. द्वि. ए. व.

पापम् पाप नपु. द्वि. ए. व.

कर्तुम् करण्याचा कृ धातू तुमून प्रत्यय

वयम् आम्ही अस्मद् प्र. ब. व.

व्यवसिताः ठरवत होतो वि+अव+सि धातू बांधणे

यत् जे यद् नपु. द्वि. ए. व.

राज्य -सुख-लोभेन राज्य सुख-लोभ पु. तृ. ए. व.

स्वजनम् स्वजन पु. द्वि. ए. व.

हन्तुम मारण्यास हन् धातू तुमून प्रत्यय

उद्यताः तयार झालो आहोत उद्+यम धातू प्रतिबंध करणे क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

महाभारतातील कौरव पांडवांचे युद्ध हे मुळात पांडवांना राज्य मिळवून देण्यासाठी नव्हतेच. तर अधर्माच्या विरोधी होते. दुष्कृत्यांचा विनाश करण्यासाठी मी परत परत अवतार धारण करतो असे श्रीभगवानकृष्णांनी 4 थ्या अध्यायातील 8 व्या श्लोकात अर्जुनाला सांगितले.

अर्जुनाला मात्र युद्ध, त्याचे होणारे परिणाम यांचा विचार करून पश्चाताप होत आहे. त्यामुळे राज्य सुखाच्या लोभापायी युद्ध करणे बरोबर नाही असे त्याला वाटत आहे. म्हणूनच तो ह्या श्लोकात असे म्हणत आहे की

किती आश्चर्यजनक आणि खेदजनक गोष्ट आहे कि आम्ही इतके मोठे पाप करायला तयार आहोत, राज्याच्या सुखाच्या लोभापायी आम्ही आपल्याच लोकांना मारायला तयार झालो आहोत.

---

**यदि मामप्रतिकारमशस्त्रं शस्त्रपाणयः। धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत्।।1.46।।**

यदि अप्रतिकारम् अशस्त्रम् माम् शस्त्र-पाणयः धार्तराष्ट्राः रणे हन्युः तत् मे क्षेमतरम् भवेत् ।

यदि जरी अव्यय

अप्रतिकारम् प्रतिकार न करणाऱ्या

न प्रतिकार पु. द्वि. ए. व.

अशस्त्रम् निशस्त्र

न शस्त्र पु. द्वि. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

शस्त्र-पाणयः हातात शस्त्र असणारे

शस्त्र पाणि पु. प्र. ब. व.

पण् धातू

धार्तराष्ट्राझ धार्तराष्ट्र पु. प्र. ब. वह

रणे युद्धात रण नपु. स. ए. व.

हन्युः मारतील हन् धातू कर्तरि विधीलिङः लकार प्र. पु. ब. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

मे माझ्या साठी अस्मद् ष. ए. व.

क्षेमतरम् श्रेयस्कर क्षेमतर नपु. प्र. ए. व.

क्षि धातू सुरक्षित असणे

भवेत् होईल भू धातू कर्तरि विधीलिङः लकार प्र. पु. ए. व.

अर्जुन आता अगदी काकुळतीला आला आहे. युद्ध करणे म्हणजे फारच मोठी घोडचूक होऊ शकते हे त्याला पूर्णपणे पटले आहे. पण युद्धभूमीवर एकदा येऊन उभे राहिले की विरूद्ध पक्षाचे मत आपल्या सारखे बदलणे शक्य नाही ह्याची सुद्धा त्याला कल्पना आहेच. युद्धभूमीवरून मागे फिरले तर नावाला बट्टा लागेल. आपल्याच लोकांना मारले तरी सुद्धा पश्चात्ताप छळत राहिल. पण शत्रू नेच आपल्याला मारून टाकले तर सर्व विवंचना संपतील असे वाटून अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

माझ्या सारख्या निशस्त्र प्रतिकार न करणाऱ्या ला, सशस्त्र धृतराष्ट्र पुत्रांनी मला युद्धात मारून टाकले तर ते माझ्या साठी श्रेयस्करच होईल.

-------------------------------------------------

**सञ्जय उवाच**

**एवमुक्त्वाऽर्जुनःसङ्ख्ये रथोपस्थ उपविशत्। विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः।।1.47।।**

सञ्जयः उवाच - सङ्ख्ये शोक-संविग्न-मानसः अर्जुनः एवम् उक्त्वा , सशरम् चापं विसृज्य , रथ-उपस्थे उपविशत्

सञ्जयः उवाच -

सङ्ख्ये रणभूमीवर सङ्ख्य नपु. स. ए. व.

सम+ख्या धातू गणना करणे

शोक-संविग्न-मानसः दुःखाने मन उद्विग्न झालेला शोक-संविग्न-मानस पु. प्र. ए. व.

शुक् धातू जाणे

सम+विज् धातू कंपित होणे

अर्जुनः अर्जुन पु. प्र. ए. व.

एवम् असे अव्यय

उक्त्वा बोलून वच् धातू क्त्वा प्रत्यय

सशरम् बाणासहित सशर पु. द्वि. ए. व.

चापं धनुष्य चाप नपु. द्वि. ए. व.

विसृज्य त्यागून वि+सृज् धातू मुक्त करणे ल्यप् प्रत्यय

रथ-उपस्थे रथाच्या मागील बाजूस रथ-उपस्थ पु. स. ए. व.

उपविशत् बसला उप+विश् धातू प्रवेश करणे कर्तरि लङः लकार प्र. पु. ए. व.

सुरवातीच्या श्लोकांमधे संजयाने राजा धृतराष्ट्रांना दोन्ही बाजूच्या सैन्यबळाची चाचपणी करत माहिती सांगितली. त्यानंतर दोन्ही बाजूच्या योद्ध्यांनी आपापले शंख फुंकले हे सुद्धा सांगितले. त्यानंतर 21 व्या श्लोकापासून अर्जुन आणि श्रीभगवानकृष्णांचे संवाद सुरू झाले ते आपण मागील श्लोकापर्यंत वाचले

. आता संजय धृतराष्ट्रांना असे सांगत आहेत की

रणभूमीवर दुःखाने मन उद्विग्न झालेल्या अर्जुनाने असे बोलून (मागील श्लोकात सांगितल्याप्रमाणे) बाणांसहीत धनुष्य बाजूला ठेवून तो रथाच्या मागच्या बाजूला (आसनावर) जाऊन बसला.

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे**

**अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥**

ॐ हे परमसत्य आहे. याप्रमाणे श्रीमद्भगवद्गीतारूपी उपनिषद तथा ब्रह्मविद्या आणि योगशास्त्राविषयी श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादातील अर्जुनविषादयोग नावाचा हा पहिला अध्याय समाप्त झाला. ॥ १ ॥

----------------🙏🙏🙏🙏🙏-------------